जिल्हा परिषदांकडील कृषि अधिकारी, गट-क (तांत्रिक) संवर्गातील अधिकाऱ्यांचे राज्य शासनाच्या कृषि विभागात कृषि अधिकारी (जिल्हा परिषद) गट-ब (कनिष्ठ) (राजपत्रित) या पदावर समावेशन.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन आदेश क्रमांकः कृषिआ १४१८/प्र.क्र.४१०/१६-अे**
मंत्रालय विस्तार इमारत,
मंत्रालय, मुंबई - ३२.
तारीख : १५ मार्च, २०२४

**वाचा:-** १) शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्र.संकीर्ण-५०१६/प्र.क्र.३९८/आस्था-८, दि.११.१०.२०१८
२) ग्रामविकास विभागाचे पत्र क्र.जिपअ-२०१९/प्र.क्र.४५/आस्था-४, दि.०६ नोव्हेंबर, २०१९
३) समक्रमांकीत शासन निर्णय दि.९ जानेवारी, २०१९ , दि.११ जानेवारी, २०२१ आणि दि.१३ मे, २०२२
४) ग्रामविकास विभागाचे क्र.जिपअ-२०२३/प्र.क्र.१८/आस्था-४,दि.१६.०२.२०२३ चे पत्र.
५) ग्रामविकास विभागाचे क्र.जिपअ-२०२३/प्र.क्र.०५/आस्था-४, दि.१२.०४.२०२३ चे पत्र.
६) कृषि आयुक्तालयाची जा.क्र.कृ.आ.पुणे/नस्ती/आस्था-४/२०२२/१९२/२०३८५, दि.१९/०६२०२३ आणि २०६३९, व दि.२० जून, २०२३ ची पत्रे.

**प्रस्तावना :-**

ग्रामविकास विभागाच्या उपरोक्त संदर्भाधीन दि.११.१०.२०१८ रोजीच्या शासन निर्णयानुसार, जिल्हा परिषदेकडील कृषि अधिकारी, गट-क(तांत्रिक) या संवर्गाचे रुपांतरण करुन राज्य शासनाकडील कृषि विभागात, कृषि अधिकारी (जिल्हा परिषद) गट-ब (कनिष्ठ) (राजपत्रित) या पदनामाचा नवीन संवर्ग निर्माण करुन या संवर्गास राजपत्रित दर्जा देण्यात आला आहे. जिल्हा परिषदेकडील कृषि अधिकारी, गट-क(तांत्रिक) संवर्गात कार्यरत असणारे जे अधिकारी नवीन संवर्गात म्हणजेच कृषि अधिकारी (जिल्हा परिषद) गट-ब(कनिष्ठ) (राजपत्रित) संवर्गात समाविष्ट होऊ इच्छितात, त्याबाबतची कार्यपध्दती व मार्गदर्शक सूचना, कृषि विभागाने उपरोक्त दि.०९ जानेवारी, २०१९ च्या शासन निर्णयानुसार निर्गमित केलेल्या आहेत.

त्यानुसार कृषि अधिकारी (जिल्हा परिषद) गट-ब (कनिष्ठ) (राजपत्रित) या संवर्गात समाविष्ट होण्यासाठी विकल्प देणाऱ्या अधिकाऱ्यांची माहिती ग्रामविकास विभागाने कृषि विभागास सादर केलेली होती. ग्राम विकास विभागाने सादर केलेल्या माहितीनुसार, कृषि अधिकारी (जिल्हा परिषद) गट-ब (कनिष्ठ) (राजपत्रित) या संवर्गात समाविष्ट होण्यासाठी विकल्प देणाऱ्या जिल्हा परिषदेकडील, कृषि अधिकारी, गट-क (तांत्रिक) संवर्गातील ३८१ अधिकाऱ्यांचे दि.११ जानेवारी,

२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये व १९ अधिकाऱ्यांचे दि.१३.०५.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्य शासनाच्या कृषि, पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागात समावेशन करण्यात आलेले आहे.

२. शासनाच्या दि.११.०१.२०२१ व १३.०५.२०२२ रोजीच्या शासन निर्णयासोबतच्या यादीमध्ये समावेश न झालेल्या, परंतु, कृषि अधिकारी (जिल्हा परिषद), गट-ब (कनिष्ठ) (राजपत्रित) पदासाठी विकल्प दिलेल्या कृषि अधिकारी, गट-क (तांत्रिक) संवर्गातील एकूण ७ अधिकाऱ्यांच्या समावेशनाबाबतची माहिती कृषि आयुक्तालयाने व ग्राम विकास विभागाने या विभागास सादर केली आहे. त्यानुसार शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

जिल्हा परिषदेकडील कृषि अधिकारी, गट-क (तांत्रिक) संवर्गात कार्यरत असणाऱ्या अधिकाऱ्यांपैकी, सोबत जोडलेल्या प्रपत्र-ब मधील अधिकाऱ्यांनी, राज्य शासनाच्या कृषि, पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागातील नव्याने निर्माण करण्यात आलेल्या, कृषि अधिकारी (जिल्हा परिषद) गट-ब (कनिष्ठ) (राजपत्रित) या संवर्गात समाविष्ट होण्यासाठी विकल्प दिलेला आहे. त्यानुसार या शासन निर्णयासोबतच्या प्रपत्र-ब मधील ०७ अधिकाऱ्यांचे समावेशन राज्य शासनाच्या कृषि विभागात करण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयासोबतच्या प्रपत्र-ब मधील ०७ अधिकाऱ्यांना दि.११.०१.२०२१ रोजीच्या शासन निर्णयातील, तसेच, कृषि अधिकारी(जिल्हा परिषद) गट-ब(कनिष्ठ) (राजपत्रित) या संवर्गातील अधिकाऱ्यांबाबत वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयांतील तरतूदी जशाच्या तशा लागू राहतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१६०००९३७२१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRATIBHA MADHAV PATIL

Digitally signed by PRATIBHA MADHAV PATIL
DN: CN = PRATIBHA MADHAV PATIL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2024.03.16 00:21:00 +05'30'

**(प्रतिभा पाटील)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.राज्यपाल महोदयांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

३. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव (ग्रामविकास), ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८. अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग,मंत्रालय, मुंबई
९. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१०. सर्व विभागीय आयुक्त
११. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा ) १/२, महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
१३. सर्व, जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
१४. उप सचिव (आस्थापना) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, पुणे
१६.संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१७.संचालक, डॉ.यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), बाणेर रोड, पुणे
१८.संचालक, वनामती, नागपूर
१९.कृषि सह संचालक (आस्थापना), कृषि आयुक्तालय, पुणे
२०.सर्व विभागीय कृषि सह संचालक
२१.सर्व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी
२२. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२३. अवर सचिव (कार्यासन १५-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
२४. कक्ष अधिकारी (कार्यासन ५-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
२५. निवडनस्ती - का.क्र. १६-अे

## शासन आदेश क्रमांकः कृषिआ १२१८/प्र.क्र.४१०/१६अे, दि. १५/०३/२०२४ सोबतचे “प्रप्रत्र-ब”

कृषि अधिकारी गट -क (तांत्रिक) संवर्गातून कृषि अधिकारी (जिल्हा परिषद) गट -ब (कनिष्ठ) (राजपत्रित) या पदावर कायमस्वरुपी वर्ग होणा-या अधिका-यांची माहिती (राज्यस्तरीय) (ज्येष्ठतेनुसार)

प्रपत्र ब (राज्यशासनाकडे वर्ग होण्यास विकल्प देणारे अधिकारी

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | जिल्हा परिषद | सेवार्थ आयडी | सेवेत दाखल दिनांक व मूळ पद | जन्मतारीख | सेवेत दाखल होण्याचा मार्ग सरळसेवा / पदोन्नती | मूळ जात प्रवर्ग | निवडीचा पदोन्नती प्रवर्ग | जात वैधता आहे की नाही | सध्याच्या पदावर पदोन्नतीचा/ सरळसेवा दिनांक | सध्याच्या मुख्यालयात कधीपासून कार्यरत आहे | विभागीय चौकशी सद्यस्थिती प्रस्तावित/ प्रलंबित |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ |
| १. | श्री.प्रदिप लोटु धांडे | जळगाव | ०२ZPEPLDM७३०१ | २२.०१.२००९ विस्तार अधिकारी (कृषी) | २९.०७.१९७३ | पदोन्नती | इ.मा.व. | खुला | आहे | ०५.०८.२०१९ | १३.०८.२०१९ | नाही |
| २. | कु.पी.डी.लेंडे | नागपूर | ०२ZPEPDLF८२०१ | ०५.०८.२००६ विस्तार अधिकारी (कृषी) | २०.१२.१९८२ | पदोन्नती | कुणबी/ इ.मा.व. | खुला | आहे | १८.१२.२०२० | २४.१२.२०२० | नाही |
| ३. | कु.गितांजली नांदुरकर | नागपूर | ०२ZPEGPNF७२०१ | ०५.०८.२००६ विस्तार अधिकारी (कृषी) | २१.०९.१९७२ | पदोन्नती | कुणबी/ इ.मा.व. | खुला | आहे | १८.१२.२०२० | ३०.१२.२०२० | नाही |
| ४. | श्री.प्रविण केरबा नागरगोजे | नागपूर | ०२ZPEPKNM७६०१ | २४.११.२००८ विस्तार अधिकारी (कृषी) | ०१.०६.१९७६ | पदोन्नती | वंजारी/ भ.ज.ड | खुला | आहे | १८.१२.२०२० | २१.१२.२०२० | नाही |
| ५. | श्री.मंगेश बापुराव पंधरे | वर्धा | ०२ZPEMBPM८३०३ | ०३.०८.२००६ विस्तार अधिकारी (कृषी) | ०३.०८.१९८३ | पदोन्नती | अ.ज. / गोंड | खुला | आहे | १३.०९.२०१९ | १३.०९.२०१९ | नाही |
| ६. | श्री.दिलीप पांडुरंग उखळकर | वर्धा | ०२ZPEDPUM७२०१ | ३०.०६.१९९४ ग्राम सेवक | ०१.०७.१९७२ | पदोन्नती | इ.मा.व./ शिंपी | खुला | आहे | ११.०१.२०२१ | ११.०१.२०२१ | नाही |
| ७. | श्री.अतुलकुमार मधुकरराव शेंडे | वर्धा | ०२ZPEAMSM६५०३ | १७.०१.१९९१ ग्राम सेवक | १०.०७.१९६५ | पदोन्नती | इ.मा.व./ तेली | खुला | आहे | ११.०१.२०२१ | ११.०१.२०२१ | नाही |